स्थानिक विकास निधी कार्यक्रमांतर्गत
विधी मंडळाच्या सर्व सभासदांना
संगणक उपलब्ध करुन देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक सीओएम १०००/प्रक्र६१/२००१/३९
मंत्रलय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- १८ जुलै, २००१.

वाचा:- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीओएम / १०००/प्रक्र६१/२०००/३९,दिनांक २१ जुले, २०००.

प्रस्तावना:-

राज्याचे प्रशासन अधिक गतीमान व पारदर्शक करण्याच्या दृष्टीने माहिती तंत्रज्ञानाचा सुयोग्य वापर व्हावा, त्यासाठी शासनाच्या मुख्यालयात तसेच दुय्यम कार्यालयात संगणकीकरणाला चालना मिळावी यासाठी कालबध्द कृती कार्यक्रम राबविण्यात येत आहे. या कार्यक्रमाची अधिक प्रभावीपणे अंमलबजावणी व्हावी यादृष्टीने विधी मंडळाच्या सर्व सन्माननीय सभासदांना संगणक उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीओएम १०००/प्रक्र६१/२०००/३९,दिनांक २१ जुलै, २००० निर्गमित करण्यात आला. त्यानंतर विधान मंडळ सचिवालयाच्या संगणक समितीने निश्चित केलेल्या विनिर्देशानुसार संगणक/लॅपटॉप आणि लेझार प्रिंटर देण्याचे ठरविले आहे. त्यामुळे संगणकाची किंमत वाढणार आहे. तसेच संगणकाची देखभाल व निगा याबाबत सुधारित आदेश निर्गमित करणे आवश्यक असल्याने शासन निर्णय, दि. २१ जुलै, २००० हा रद्द करण्यात येत असून सर्व समावेशक असा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

शासन निर्णय:-

स्थानिक विकास निधी कार्यक्रमांतर्गत विधी मंडळाच्या सर्व सन्माननीय सभासदांना त्यांच्या इच्छेप्रमाणे लॅपटॉप किंवा डेक्सटॉप आणि लेझार उपलब्ध करुन देण्याबाबत पुढील प्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत:-

१) ही योजना आमदार स्थानिक विकास कार्यक्रम योजनांतर्गत हाती घेऊन राबविण्यात येणार आहे.

२) शासन निर्णय, दि. २१.७.२००० अन्वये ज्या विधान सभा मतदार संघ/विधान परिषद मतदार संघ साठी यापूर्वी या योजनेतून काही जिल्हाधिकारी कार्यालयाकडून संगणक उपलब्ध करुन घेतला आहे, त्यांना परत या योजनेतून संगणक घेणे अनुज्ञेय असणार नाही.

३) संगणक संयंत्राची खरेदी ही केंद्रीभूत पध्दतीने किंवा दर करारानुसार करण्यात यावी.

४) खरेदी करण्यात आलेल्या लॅपटॉप/डेस्कटॉप आणि लेझार प्रिंटर यांची नोंद वाटपानंतर त्या त्या जिल्हाधिकारी कार्यालयाने त्यांच्या जडवस्तू नोंद वहीत घ्यावी.

५) लॅपटॉपची खरेदी करताना त्यात तीन वर्षासाठी देखभाल व दुरुस्तीचा खर्च अंतर्भूत करण्यात यावा. पहिल्या वर्षासाठी देखभाल व दुरुस्तीसाठी देय असलेली रक्कम योग्य ती बँक गॅरंटी घेऊन माहिती व तंत्रज्ञान/ सामान्य प्रशासन विभाग यांचे मार्फत परस्पर देण्यात यावी. दुस-या व तिस-या वर्षाच्या देखभाल व दुरुस्तीसाठी देय असलेली रक्कम योग्य रीतीने समाधानकारक सेवा मिळाली तर दुस-या व तिस-या वर्षाच्या शेवटी जिल्हाधिका-यांनी कॉम्प्युटर कंपनीला परस्पर द्यावी.

६) देखभाल कराराची अंमलबजावणीची जबाबदारी जिल्हाधिकारी यांचेवर राहिल.

७) विधान सभा सदस्य/विधान परिषद सदस्य यांनी जिल्हाधिकारी यांच्याकडून प्राप्त करुन घेतलेले लॅपटॉप/डेस्कटॉप व लेझर प्रिंटर जिल्हाधिकारी यांचेकडे त्यांचा कार्यकाल संपल्यावर परत करावा.

८)विधान मंडळ सचिवालयाच्या संगणक समितीने निश्चित केलेल्या विनिर्देशानुसार संगणक व लेझर प्रिंटर खरेदी करण्यासाठी आर्थिक मर्यादा रु. १,५०,०००/- करण्यात आली असून लॅपटॉप व लेझर प्रिंटर साठी आर्थिक मर्यादा रु. २,००,०००/- एवढीच रहाणार आहे.

९) आमदार महोदयांच्या इच्छेनुसार ज्या विधान सभा सदस्य/विधान परिषद सदस्य यांना लॅपटॉप/डेस्कटॉप संगणक केंद्रीभूत पध्दतीने उपलब्ध करुन दयावयाचा आहे, त्यांची नांवे, मतदार संघ व प्रत्येकी आवश्यक निधी विधान मंडळ सचिवालयाने किंवा सामान्य प्रशासन विभाग/माहिती तंत्रज्ञान यांनी नियोजन विभागाला कळवावा म्हणजे नियोजन विभाग त्यानुसार निधी माहिती तंत्रज्ञान सामान्य प्रशासन विभागास उपलब्ध करुन देईल.

हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

सुनील सोनी
सचिव, माहिती तंत्रज्ञान, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व राज्यमंत्री यांचेस्वीय सहाय्यक
शासनाचे मुख्य सचिव
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी)
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय,अपील शाखा, मुंबई
* प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय,मुंबई
* सचिव महाराष्ट्र लोकआयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
* प्रधान सचिव महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व मंत्रालयीन विभाग
मंत्रलयीन विभागांच्या नियंत्रणाखाली सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यालये,
वित्त विभाग/व्यय-४, मंत्रालय
नियोजन विभाग/का. १४४५, मंत्रालय
निवड नस्ती

Dait_Training\\C:\My Documents\AJIT GAVHANE FILE Waradpande_1
GR-200204221234070000-0104
1/379(4,500-7-01)IA